महाराष्ट्र विमानतळ विकास प्राधिकरण (मिहान) नागपूर यांनी राज्य आपत्ती व्यवस्थापन संस्था, नागपूर करीता उपलब्ध करून दिलेल्या जागेचा मोबदला अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक: आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१४०/आव्यप्र-१**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- ०१ जुलै, २०२४

**वाचा -** या विभागाचा शासन निर्णय क्रमांक: आव्यप्र-२०२०/प्र.क्र.१४०/आव्यप्र-१ दिनांक:- ३१ मार्च २०२४.

**प्रस्तावना-:**

महाराष्ट्र राज्य हे बहुआपत्तीप्रवण राज्य असून राज्यामध्ये येणाऱ्या नैसर्गिक व मानवनिर्मित आपत्तीचा सामना करण्यासाठी प्रशिक्षण देण्यासाठी तसेच संबंधित आपत्तीचा अभ्यास करुन उपलब्ध असलेल्या अत्याधुनिक साधनसामुग्रीचा वापर करुन प्रतिसाद देण्यासाठी राज्यात नागपूर येथे राज्य आपत्ती व्यवस्थापन संस्था (SIDM) स्थापन करण्यास राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने मान्यता दिली आहे. सदर संस्थेसाठी शासकीय जमिन उपलब्ध न झाल्याने महाराष्ट्र विमानतळ विकास प्राधिकरण (मिहान) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या जागेपैकी १० एकर जागा नाममात्र शुल्क दराने उपलब्ध करून देण्यास सामान्य प्रशासन विभागात विनंती करण्यात आली होती. त्यानुषंगाने सदर जागेसाठी आकारण्यात येणाऱ्या दरानुसार महाराष्ट्र विमानतळ विकास प्राधिकरणास (मिहान) निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

राज्यात आपत्तीसंबंधीची तयारी, सौम्यिकरण, आपत्ती प्रवणता, धोका, आपत्ती नंतर मदत व पुनर्वसन, पुनर्वबांधणी, प्रतिसाद, प्रशिक्षण, पुर्णअवस्था (Build-Back-Better) या बाबींचे व्यवस्थापन, व नियोजन करून त्यांची सांगड घालणे यासाठी राज्य आपत्ती व्यवस्थापन संस्था (SIDM) नागपूर या संस्थेकरीता महाराष्ट्र विमानतळ विकास प्राधिकरणास प्राधिकरणाची (मिहान) प्लॉट क्र. ०६ सेक्टर १२ A मधील १० एकर जागेसाठी रु.३४५० प्रति चौ.मी. या दराने महाराष्ट्र विमानतळ विकास प्राधिकरणास (मिहान) एकुण रु १३,९६,१६,६७०/- (रु. तेरा कोटी शहाण्णव लाख सोळा हजार सहाशे सत्तर फक्त) इतक्या इतकी रक्कम अदा करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भादिन शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विमानतळ विकास प्राधिकरणास (मिहान) प्लॉट क्र. ०६ सेक्टर १२ A मधील १० एकर जागेसाठी रु.३४५० प्रति चौ.मी. यानुसार सदर जमिनीचा मोबदला म्हणून रु. ४.८० कोटी एवढा निधी वितरित करण्यात आला होता. उर्वरित निधी रु. ९,१६,१६,६७०/- (अक्षरी नऊ कोटी सोळा लक्ष सोळा हजार सहाशे सत्तर मात्र ) वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

३.   या कामी होणारा खर्च मागणी सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८० सर्वसाधारण (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून करण्यात येईल. सदर निधी विभागीय आयुक्त नागपूर यांना अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल.

४.   सदर आदेश वित्तीय अधिकार नियम १९७८ मधील शासन निर्णय क्र. वि.अ.प्र.-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक. १७ एप्रिल २०१५ मधील परिछेद ३ (अ) नुसार, व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग १, उपविभाग ५, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखाली प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारामधील नियम क्रमांक १३४ अन्वये सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने तसेच नियोजन विभाग, अनौ. सं.क्र.२४२४/२०२४, दिनांक १५ मे २०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१६/२०२४/व्यय ९, दिनांक १७ जुन, २०२४ रोजी दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०७०३१६५७५०७०१९ असा आहे. सदर शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.07.03 17:08:35 +05'30'

**(हि.या.दुफारे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री तथा मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
९) संचालक, (आपत्ती व्यवस्थाप प्रभाग), मंत्रालय, मुंबई
३) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, नागपूर.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा),मुंबई.
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९) निवड नस्ती/आव्यप्र-१.